**मुरगुड ता. कागल, जि. कोल्हापूर येथील मुरगुड शहर सांडपाणी प्रक्रीया योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास व आराखडयास सुधारीत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र.भूसवियं २४०८/प्र. क्र. ३४०/पापु१७,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :-.०८/०६/२०१०**

**वाचा:-** १) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, भूसंवियो२४०४/प्र.क्र.०१/पापु १७, दि. २७.२.२००४.

२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली यांचे पत्र क्र. तांशा-३/मुरगुड/११४१, दि.७.४.२०१०.

प्रस्तावनाः-

मुरगुड ता. कागल, जि. कोल्हापूर येथील मुरगुड शहर सांडपाणी प्रक्रीया योजनेच्या रु. ७९.२८ लक्ष ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि काही कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. १४.७५ लक्ष इतकी वाढ झाली. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ सांगली यांच्याकडून प्राप्त झालेल्या मुरगुड ता. कागल, जि. कोल्हापूर येथील मुरगुड शहर सांडपाणी प्रक्रीया योजनेला सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

प्रस्तावनेमध्ये नमुद केलेल्या बाबींस अनुसरुन मुरगुड ता. कागल, जि. कोल्हापूर येथील मुरगुड शहर सांडपाणी प्रक्रीया योजनेच्या रुपये ९४.०६ (रुपये चौ-याण्णव लक्ष सहा हजार फक्त) ढोबळ किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेस योजनेच्या ढोबळ खर्चाच्या ९० % म्हणजेच रु.८४,६५,३१०/- (अक्षरी चौऱ्याऐंशी लक्ष पासष्ट हजार तीनशे दहा फक्त) शासकीय अनुदान मंजूर करण्यात येत आहे. हे

अनुदान ११ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्य शासनास उपलब्ध व्हावयाच्या अनुदानातून देय असेल.

३. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

४. या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्याचेही पालन करण्यांत यावे.

५. ही योजना पूर्ण झाल्यावर नगर परिषदेच्या ताब्यात देण्यात येईल. ही योजना संबंधित नगर परिषदेच्या ताब्यात राहील. संबंधीत अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत नगर परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संबंधित अभियंत्यांनी व संबधित नगर परिषदेच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

६. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण , दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) याचा दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करणे, निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी नगर परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. नगर परिषदेने स्वच्छता करात आवश्यकती वाढ करुन योजना स्वावलंबी ठरेल अशी पाहण्याची जबाबदारी संबंधित नगर परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता स्वच्छता कराची आकारण्यात यावी. वरीलप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिदृष्ट्या स्वयंपूर्ण झाली नाही तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च नगर परिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल.

मुरगुड मलनि:सारण व सांडपाणी प्रक्रिया योजनेचा आर्थिक आकृतीबंध खालीलप्रमाणे आहे :-

(अ) योजनेची किंमत :-

| | | |
|---|---|---|
| १. | योजनेची ढोबळ किंमत (१७.५ % आस्थापना व संयंत्र खर्चासह | रु.९४,०५,९००/- |

(ब) योजनेचा वित्तीय आकृतीबंध :-

| | | |
|---|---|---|
| १. | शासकीय अनुदान (९०%) | रु.८४,६५,३१०/- |
| २. | लोकवर्गणी (१०%) | रु.९,४०,५९०/- |
| | योजनेची एकूण ढोबळ किंमत | रु.९४,०५,९००/- |

७. ही योजना चालु आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये पुर्ण केली जाईल, याची दक्षता घेण्यात यावी.

८. या योजनेवर होणारा हा वाढीव खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता १९१, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादीनां सहाय्य केंद्र पुरस्कृत योजना (०३), (०३) अकराव्या वित्त आयोगाच्या शिफारसीनुसार भारत सरकार चे विशेष सहाय्य (२२१५ २० २६) ४१, सहायक अनुदाने या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली केलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

९. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. २०७/व्यय ३, दिनांक १४ .०५.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००६०८१३५९५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( राजेंद्र कुमटगी)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, कोल्हापूर
३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग, पुणे.
४. मुख्याधिकारी, मुरगुड नगर परिषद, जि. कोल्हापूर.
५. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
६. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली.
७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, कोल्हापूर
८. महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर.
९. महालेखापाल, लेखापरीक्षा , महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर.
१०.प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११.मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२.मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१३.मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१४.कार्यासन क्र.पापु-०४,०५,०६,०८,०९,१०,१८पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.संगणककक्ष, पाणीपुरवठाव स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवडनस्ती कार्यासन पापु-१७

*******

**शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. पापुयो२४०८/प्र. क्र. ३४०/पापु१७, दि.०८/०६/२०१० चे सहपत्र**

**(रु. लाखात)**

| योजनेचे नाव | योजनेची मुळ मंजूर किंमत | योजनेची सुधारित किंमत |
|---|---|---|
| मुरगुड ता. कागल, जि. कोल्हापूर | ७९.२८ लक्ष | ९४.०६ लक्ष |

(राजेंद्र कुमटगी)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन